



# महाराष्ट्र शासन

**क्रमांक:-गौखनि-३७/०५१८/प्र.क्र.२१०/ख-१**

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० जुलै, २०२३.

**विषय:-गौण खनिज- सोलापूर**

सन २०१५-१६ या वर्षाकरीता मौजे सिध्दापूर-खानापूर, ता.दक्षिण सोलापूर-मंगळवेढा, जि.सोलापूर या संयुक्त वाळूगटात वाळूसाठा उपलब्ध नसल्याने उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम परत करणेबाबत.

**मे.सरसाई इंडस्ट्रीज तर्फे श्री.शरणबसप्पा संगप्पावाले**

**शासन ज्ञापन :-**

सन २०१५-२०१६ या वर्षाकरीता दिनांक ०५/११/२०१५ रोजी घेण्यात आलेल्या लिलावात मौजे सिध्दापूर-खानापूर, ता.दक्षिण सोलापूर-मंगळवेढा, जि.सोलापूर हा संयुक्त वाळूगट ८१,११३ ब्रास वाळू परिमाणाकरीता मे.सरसाई इंडस्ट्रीज तर्फे श्री.शरणबसप्पा संगप्पावाले यांना रु.१५,०८,७१,०००/- इतक्या सर्वोच्च बोलीने मंजूर करण्यात आला. लिलावधारक श्री.शरणबसप्पा संगप्पावाले यांनी लिलावाची रक्कम शासनजमा केल्यानंतर लिलावधारक यांचेसोबत करारनामा करुन दि.१४/०२/२०१६ रोजी वाळूगटाचा ताबा देण्यात आला आहे.

०२. सदर वाळूगटात वाळू नसल्याने वाळू उपसा बंद करत असल्याचे लिलावधारक यांनी दि.३०/५/२०१६ रोजी जिल्हाधिकारी कार्यालयास कळविले. तसेच तलाठी, सिध्दापूर यांनी दि.३१/५/२०१६ पासून वाळूगटातून वाळू उपसा बंद असल्याचा पंचनामा केला. याबाबत जिल्हाधिकारी कार्यालयाकडून मे.बी.के.पानमंद यांनी उक्त वाळूगटाची तांत्रिक मोजणी करुन अहवाल सादर करणेबाबत कळविले. त्यानुसार मे.बी.के.पानमंद यांनी उक्त वाळूगटाची तांत्रिक मोजणी करुन ८१,११३ ब्रास वाळू परिमाणापैकी २३३०३.५७२ ब्रास परिमाणाचे वाळू उत्खनन केले असल्याचा व वाळूगटात वाळू उपलब्ध नसल्याचा अहवाल सादर केला आहे.

०३. उक्त वाळूगटात वाळू उपलब्ध नसल्याने उत्खनन न करता आलेली वाळूची प्रमाणशीर रक्कम परत मिळणेबाबत लिलावधारक यांनी मा.मंत्री (महसूल) यांचेकडे अपील अर्ज दाखल केला असता मा.मंत्री (महसूल) यांनी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता,१९६६ च्या कलम २५८ च्या तरतूदीनुसार त्यांच्या अर्धन्यायिक अधिकारात दि.१९/०९/२०१९ रोजी आदेश पारीत केलेत. मा.मंत्री (महसूल) यांनी पारीत केलेल्या आदेशानुसार प्रस्ताव तपासून वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सोलापूर यांचे अनुक्रमे दि.२९/६/२०१५ व ३०/६/२०१५ रोजी सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या आधारे तसेच मे.बी.के.पानमंद यांनी उक्त वाळूगटाची तांत्रिक मोजणी २३३०३.५७२ ब्रास परिमाणाचे वाळू उत्खनन केले असल्याचा व वाळूगटात वाळू उपलब्ध नसल्याचा अहवाल विचारात घेवून लिलावधारक मे.सरसाई इंडस्ट्रीज तर्फे श्री.शरणबसप्पा संगप्पावाले यांना ८१,११३ ब्रास वाळू परिमाणापैकी ५७,८०९.५ ब्रास वाळू परिमाणाचे उत्खनन करता आले नाही.

**०४.** उक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन लिलावधारक मे.सरसाई इंडस्ट्रीज तर्फे श्री.शरणबसप्पा संगप्पावाले यांना मौजे सिध्दापूर-खानापूर, ता.दक्षिण सोलापूर-मंगळवेढा, जि.सोलापूर या संयुक्त वाळूगटात वाळू उपलब्ध नसल्यामुळे मंजूर वाळू परिमाणापैकी उत्खनन न करता आलेल्या ५७,८०९.५ ब्रास वाळू परिमाणाकरीता रूपये १०,७५,२६,२४८/- (रुपये दहा कोटी पंचाहत्तर लाख सव्वीस हजार दोनशे अठ्ठेचाळीस फक्त) एवढी प्रमाणशीर रक्कम परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**०५.** सबब, लिलावधारक मे.सरसाई इंडस्ट्रीज तर्फे श्री.शरणबसप्पा संगप्पावाले यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर देय रक्कम रूपये १०,७५,२६,२४८/- (रुपये दहा कोटी पंचाहत्तर लाख सव्वीस हजार दोनशे अठ्ठेचाळीस फक्त) इतकी अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**०६.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२०२४ या वर्षाकरीता “लेखाशीर्ष “०८५३- अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग” १०२-खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग- वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)” खाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०७.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७७/२०२२/व्यय-०९, दि.०१/१२/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०७२७१२५११०५७१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.07.27 12:53:54 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी,सोलापूर

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४, साधनसंपत्ती कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख-१”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.